**<u>सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१७</u>**
**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रतिक्षायादीतील शिफारस केलेल्या उमेदवारांचे मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांक : एएससी १४१८/प्र.क्र. ९०/१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक : ०२२-२२७९४१७२.
दिनांक : २४ ऑक्टोबर, २०१८

<u>वाचा</u> :- १) समक्रमांकाचे शासन ज्ञापन दिनांक २२ मे, २०१८
२) सामान्य प्रशासन विभाग, शा.परिपत्रक क्र. मलोआ २०१७/प्र.क्र.१२६/१४-अ, दिनांक २१-०८-२०१७

**<u>ज्ञापन :-</u>**

गट-ब (अराजपत्रित) मधील सहायक कक्ष अधिकारी या पदावर नियुक्ती करण्यासाठी घेण्यात आलेल्या सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१७ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने क्रमांक: १४४२(२)(२)/२०१७/१३-अ, दिनांक ७.५.२०१८ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या व निवडसूचीत समावेश करण्यात आलेल्या उमेदवारांचे संदर्भाधिन क्र. १ च्या आदेशान्वये मंत्रालयीन विभाग व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आले होते. तथापि रुजू न झालेल्या उमेदवारांच्याऐवजी संदर्भाधिन क्र. २ येथील शासन परिपत्रकातील तरतूदीनुसार आयोगाकडे दिनांक १४-०८-२०१८ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने क्रमांक: १४४२(२)(२)/२०१७/१३-अ, दिनांक ५.१०.२०१८ च्या पत्रान्वये शासनाने कळविल्यानुसार रूजू न झालेल्या प्रवर्गातील आरक्षित जागांसाठी प्रतिक्षायादीतील उमेदवार उपलब्ध करुन दिले आहेत. सोबतच्या **विवरणपत्र "अ"** मधील उमेदवारांचे त्यांच्या नावांसमोर दर्शविलेल्या मंत्रालयीन विभाग/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात येत आहे.

२. सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांची नेमणूक पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात यावी :-

(१) सदर विवरणपत्रातील सर्व उमेदवारांनी **दिनांक २६.११.२०१८ पर्यंत** संबंधित विभाग/कार्यालयात व्यक्तिश: उपस्थित राहून अस्थायी नियुक्तीचा स्वीकार करणे आवश्यक आहे. **सदरहू कालावधीत उमेदवारांनी अस्थायी नियुक्ती स्विकारली नाही तर त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता, या विभागाच्या/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवडसूचीतून कमी करण्यात येईल**. तसेच विहित कालावधीत नियुक्ती स्वीकारणाऱ्या उमेदवारांची ज्येष्ठता महाराष्ट्र नागरी सेवा (सेवाज्येष्ठतेचे विनियमन) नियम, १९८२ मधील तरतूदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक ५.१०.२०१८ च्या पत्रान्वये

केलेल्या शिफारस क्रमांकानुसार राहिल. तसेच शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी./प्र.क्र.२०७/कार्या.१२, दिनांक २८.०५.२०१८ मधील तरतुदीनुसार **"सदर उमेदवारांची शिफारस ही प्रतिक्षायादीमधून झालेली असल्यामुळे, सदर उमेदवारांची ज्या आदेशान्वये नियुक्ती होईल. त्या आदेशानुसार ते ज्या दिनांकास रुजू होतील त्या दिनांकास त्यांची ज्येष्ठता निर्धारित केली जाईल. सदर उमेदवारांना मूळ गुणवत्ता यादीनुसार ज्येष्ठतेचे लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत"**

(२) लोकसेवा आयोगाकडे केलेल्या अर्जातील दाव्याची तपासणी / पडताळणी आयोगाने केलेली नसल्याने, नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०१७ साठी देण्यात आलेल्या जाहिरात क्रमांक : ६८/२०१७, दिनांक १३.१०.२०१७ मध्ये नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची दिनांक १.८.२०१७ रोजीच्या अर्हतेनुसार तसेच शैक्षणिक आणि अन्य अटींची दिनांक २७.१०.२०१७ रोजीच्या अर्हतेनुसार खाली नमूद केलेली मूळ प्रमाणपत्रे उमेदवारांनी सोबत घेऊन जावीत. नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना सदर प्रमाणपत्रांची साक्षांकित प्रत उमेदवाराजवळ असणे अत्यावश्यक आहे :-

(अ) वयोमर्यादा (दिनांक १.८.२०१७ रोजी)

(ब) अधिवास : मुख्य परीक्षेच्या जाहिरातीत नमूद केल्याप्रमाणे

(क) शैक्षणिक अर्हता: सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा महाराष्ट्र शासनाने मान्य केलेली समतुल्य अर्हता मुख्य परीक्षेचा अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास किंवा तत्पूर्वी म्हणजेच दिनांक २७.१०.२०१७ रोजी किंवा तत्पूर्वी धारण करणे अत्यावश्क आहे.

(ड) महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांच्या बाबत महिला आरक्षणासंदर्भात विहित केलेले **दिनांक १.४.२०१६ ते ३१.३.२०१७ या वित्तीय वर्षातील किंवा तदनंतरचे** प्रमाणपत्र

(इ) मागासवर्गीय असल्यास जाती/जमातीबद्दल विहित नमुन्यात आणि विहित अधिकाऱ्याने दिलेले मूळ प्रमाणपत्र. तसेच संबंधित विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती यांनी दिलेले जात वैधता प्रमाणपत्र. अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांसाठी उन्नत व प्रगत गटात (क्रिमीलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १.४.२०१६ ते ३१.३.२०१७ या वित्तीय वर्षातील किंवा तदनंतरचे** प्रमाणपत्र.

(फ) खेळाडू/शारीरिक अपंग असल्यास, त्याबाबतचे सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेले मूळ प्रमाणपत्र.

(३) उमेदवारांच्या पात्रता विषयक म्हणजेच शिक्षण, वय, खेळाडू, शारीरिक अपंग, जाती विषयक प्रमाणपत्र, इत्यादीबाबतच्या मूळ प्रमाणपत्रांची पडताळणी आयोगाने तसेच या विभागाने केली नसल्यामुळे या सर्व बाबतीत नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी पडताळणी करणे आवश्यक आहे. प्रस्तुत उमेदवारांचे शिक्षण, वय, खेळाडू असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, शारीरिक अपंग असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, इत्यादीबाबतची मूळ

प्रमाणपत्रेही अधिसूचनेत नमूद केलेल्या अर्हतेनुसार आहेत किंवा कसे? हे नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती करतानाच प्रथम तपासून पहावीत. आयोगाला केलेल्या अर्जातील दाव्याच्या तपासणीसाठी आवश्यक व योग्य ती प्रमाणपत्रे उमेदवार नियुक्ती प्राधिकाऱ्यांना सादर करु शकला नाही तर, उमेदवाराची नियुक्ती करण्यात येणार नाही व उमेदवाराची शिफारस आपोआप रद्द समजण्यात येईल व तसे आयोगाला कळविण्यात येईल.

(४) महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या महिला उमेदवारांकडून महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : ८२/२००१/मसेआ-२०००/ प्र.क्र.४१५/का.२, दिनांक २५.५.२००१ व शासन निर्णय क्रमांक संकीर्ण- २०१७/ प्र.क्र.१९१/१७/कार्या-२, दिनांक १५-१२-२०१७ नुसार शासनाने प्रस्तावित केलेले उन्नत व प्रगत गटात (क्रिमिलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १.४.२०१६ ते ३१.३.२०१७ या वित्तीय वर्षातील किंवा तदनंतरचे** प्रमाणपत्र संचालक, महिला व बाल कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचेकडून तपासून घेण्यात येईल व त्यामधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(५) खेळाडूंसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची शिफारस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १.७.२०१६ आणि त्यास अनुसरुन प्रसिध्द करण्यात आलेल्या शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८.८.२०१६ व तदनंतर शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार गट-ब पदासाठी निश्चित केलेले दिनांक १६.०५.२०१७ रोजीचे किंवा तत्पुर्वीचे क्रीडा प्रमाणपत्र व त्यासंदर्भातील संबंधित विभागीय क्रीडा उपसंचालकाच्या दिनांक २७.१०.२०१७ रोजीचा किंवा तत्पूर्वीचा क्रीडा प्रमाणपत्र पडताळणीबाबतचा अहवाल सादर करण्याच्या अधीन करण्यात आलेली आहे. त्यानुसार गट-ब पदाकरीता ग्राह्य असल्याबाबतच्या संबंधित विभागीय उपसंचालकांच्या वर उल्लेखित विहित दिनांकाच्या पडताळणी अहवालाच्या तपासणीनंतरच गुणवत्ताधारक खेळाडू पदावर शिफारपात्र ठरलेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्यात यावी.

(६) अपंगांसाठी राखीव पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग आणि सार्वजनिक आरोग्य विभागाच्या खाली नमूद करण्यात आलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांमधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात येईल :-

(अ) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : अपंग १००३/प्र.क्र.१२७/ २००३/१६-अ, दिनांक ६.५.२००४

(ब) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२००९/प्र.क्र.९/सुधार-३, दिनांक ३.८.२०१०

(क) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन परिपत्रक क्रमांक : अपंग २००९/प्र.क्र.१३३/सुधार-३, दिनांक १४.१.२०११

(ड) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रकि २०१२/प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दिनांक ६.१०.२०१२

(७) ज्या मागासवर्गीय उमेदवारांची खुल्या प्रवर्गातील पदावर शिफारस करण्यात आली असेल त्या उमेदवारांबाबत सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीबीसी-१०/२००४/प्र.क्र.५७०/मावक-५, दिनांक १६.५.२००७ मधील सूचनेनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(८) मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांच्याबाबत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यासाठी व जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यास अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : बीसीसी-२०१२/प्र.क्र.३३२/१२/१६-ब, दिनांक १८.५.२०१३ मध्ये नमूद सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी कार्यवाही करणे अपेक्षित असून, मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधिन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येईल. सदरहू उमेदवाराकडे जात पडताळणी समितीकडून प्राप्त करुन घेतलेले जाती वैधता प्रमाणपत्र असल्यास त्याने नियुक्तीसाठी हजर होताना ते सादर करावे. नसल्यास त्याने जाती प्रमाणपत्र पडताळणीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे/प्रमाणपत्रे नियुक्ती प्राधिकाऱ्यास तात्काळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

नियुक्ती प्राधिकाऱ्याने विनाविलंब सदर कागदपत्रे संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठवावी. याशिवाय संबंधित उमेदवाराने देखील स्वतंत्रपणे जात पडताळणी समितीकडे त्याच्याकडे असलेले कागदपत्रे/पुरावे सादर करुन पाठपुरावा करावा. जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. तसेच, शिफारस करण्यात आलेल्या सर्व उमेदवारांचे जाती दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांच्याकडून व जमातीचे दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून ते संबंधित समितीकडून निर्गमित करण्यात आल्याची खातरजमा करुन घेण्याची कार्यवाही देखील नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी.

(९) सहायक कक्ष अधिकारी पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.३.२००३ मधील तरतुदीनुसार (अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ४.२.२०१३ व शासन पुरकपत्र क्र.मातंसं २०१२/प्र.क्र.२७०/३९, दिनांक ८.१.२०१८ मध्ये

नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. तथापि, नियुक्ती स्विकारण्याच्या वेळेस सदर प्रमाणपत्र/अर्हता उमेदवारांकडे नसल्यास नियुक्ती स्विकारल्यापासून दोन वर्षाच्या आत उमेदवाराने उपरोक्त शासन निर्णयातील नमूद संस्थेचे संगणक ज्ञानाच्या अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या विहित कालावधीत उमेदवाराने सदर प्रमाणपत्र सादर न केल्यास उमेदवाराच्या सेवा समाप्त करण्यात येतील ही बाब उमेदवाराच्या नियुक्ती आदेशात स्पष्टपणे नमूद करण्यात यावी.

(१०) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १३.०८.२०१४ तसेच अन्य अद्यावत शासन निर्णयामधील तरतूदीआधारे सदर सहायक कक्ष अधिकाऱ्यांची शिफारशी करण्यात येत आहेत. शासनाने यासंदर्भात वेळोवेळी केलेल्या सूचना विचारात घेता सहायक कक्ष अधिकाऱ्यांच्या पदाकरिता अमागास समांतर आरक्षित पदांसाठी शिफारसपात्र ठरलेले उमेदवार हे प्रत्यक्षात खुल्या (अराखीव) प्रवर्गातीलच उमेदवार आहेत याची त्यांच्या शाळा/ महाविद्यालय सोडल्याच्या दाखल्याआधारे तसेच अन्य तदनुषंगिक दस्तऐवजा आधारे नियुक्तीपूर्वी खात्री व पडताळणी करुनच त्यांना सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती देण्यात यावी.

(११) प्रतिक्षायादीतील शिफारसप्राप्त ठरलेल्या ४० उमेदवारांनी मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राच्या प्रती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उपलब्ध करुन दिल्या आहेत. ते प्रत्येक उमेदवरांच्या नियतवाटप केलेल्या विभागात उमेदवारांच्या प्रोफाईल सोबत. नियुक्ती प्राधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. उमेदवारांच्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत/अर्जातील फोटो यावरुन प्रत्यक्षात रुजू झालेला उमेदवार तोच आहे का, तसेच मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळाखपत्रावरुन अर्जातील उमेदवाराचा फोटो व स्वाक्षरी, ओळखपत्रातील फोटो व स्वाक्षरी त्याच उमेदवाराची आहे का, सादर केलेले ओळखपत्र अधिकृत आहे का, याची नियुक्तीपूर्वी सखोल तपासणी करावी. तसेच उमेदवारांनी परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राची वैधता संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांकडून तपासून घेण्यात यावी. तद्नंतरच संबंधित उमेदवाराची सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती करण्यात यावी.

(१२) साक्षांकन नमुना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवारांनी तो तेथून डाऊनलोड करावा. सदर साक्षांकन नमुना पूर्णपणे भरुन उमेदवाराने त्याचे नियतवाटप करण्यात आलेल्या विभाग/कार्यालयात हजर होताना सादर करावा. हजर झालेल्या उमेदवारांकडून साक्षांकन नमुने प्राप्त करुन घेतल्यानंतर उमेदवारांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : चापअ १००८/ प्र.क्र.२१४/ ०८/१६-अ, दिनांक ९.१.२००९ मधील तरतुदी विचारात घेऊन पोलीस विभागाकडून करुन घ्यावी व अहवाल प्रतिकूल असल्यास, प्रस्तुत शासन निर्णयातील सूचनांनुसार संबंधित उमेदवारांच्याबाबत तातडीने कार्यवाही करुन तसे या विभागास अवगत करावे. **"प्रस्तुत उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी करण्यापूर्वी करण्यात येणार असल्यामुळे त्यांची नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत करण्यात आली आहे व**

**सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल."** असा स्पष्ट उल्लेख उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात करण्यात यावा. उमेदवाराच्या चारित्र्य पडताळणी संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक : चापअ १०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दिनांक २६.८.२०१४ मधील सूचनादेखील विचारात घेण्यात याव्यात.

(१३) अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांचे उन्नत व प्रगत गटात (क्रीमिलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १.४.२०१६ ते ३१.३.२०१७ या वित्तीय वर्षातील किंवा तदनंतरचे** प्रमाणपत्र सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : सीबीसी-१०/ २००६/प्र.क्र.१५/मावक-५, दिनांक ३०.६.२००६ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार तपासण्यात यावे. तसेच, यासंदर्भात सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : सीबीसी-१०/२००८/प्र.क्र.६९७/विजाभज-१, दिनांक २४.६.२०१३ अन्वये विहित केलेली तरतूद विचारात घेण्यात यावी.

(१४) मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्र. २०५३/२०१४ प्रकरणी होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या तसेच समांतर आरक्षणाच्या मुद्दयासंदर्भात तसेच अन्य मुद्दयासंदर्भात विविध मा. न्यायालय/मा.न्यायाधिकरणात दाखल करण्यात आलेल्या न्यायिक प्रकरणातील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०१७ (प्रतिक्षायादी) मधून उमेदवारांची शिफारस केली आहे याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.

(१५) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.टीआरएन-२०१४/३४२/ प्र.क्र.५०/ १४/ १२-अ, दिनांक २७.५.२०१४ व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.कअप-१२१४/प्र.क्र.६५/१४ब, दिनांक १३.५.२०१५ नुसार सर्व संवर्गातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार (पायाभूत) प्रशिक्षण अनिवार्य आहे. त्यानुसार प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांनी प्रशिक्षणासाठी सक्तीने उपस्थित राहणे गरजेचे असून, प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांना संबंधित विभागप्रमुख यांनी कार्यमुक्त करणे देखील सक्तीचे आहे.

(१६) **सहायक कक्ष अधिकाऱ्यांची पदे ही मंत्रालयीन विभाग आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात असल्याचे परीक्षेच्या जाहिरातीत स्पष्ट करण्यात आले होते. त्यामुळे अन्य जिल्ह्यामध्ये नियुक्ती देण्याची विनंती मान्य केली जाणार नाही व या संदर्भातील अर्जाची दखल घेतली जाणार नाही. तसेच, अन्य विभाग/कार्यालयात पुनर्वाटप करण्याबाबतच्या विनंतीचाही विचार करण्यात येणार नाही.**

(१७) मुंबईबाहेरील उमेदवारांनी त्यांच्या मुंबईतील निवासस्थानाबाबतची व्यवस्था स्वत:च करावयाची असून त्यासाठी **मुदतवाढ दिली जाणार नाही.**

(१८) अस्थायी नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाण्याकरीता लागणारा प्रवास खर्च उमेदवाराने स्वत:च सोसावयाचा आहे.

(१९) उमेदवाराने नियुक्ती स्विकारल्यानंतर सोबत जोडलेला रुजू अहवाल या कार्यासनास तात्काळ सादर करावा.

(२०) विभाग/कार्यालयाने नियुक्तीसाठी रुजू होणाऱ्या उमेदवारांना तात्पुरती नियुक्ती देण्यात यावी व त्यासोबतचे प्रतिवेदन कोणत्याही परिस्थितीत नियुक्तीनंतर तात्काळ या विभागाकडे पाठविण्यात यावे.

(२१) उक्त नमूद अटींची पूर्तता न झल्यास उमेदवारांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०१८१०२४११५३२०७०७ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: CN = Gajanan Bhimrao Gurav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = General Administration Department
Date: 2018.10.24 12:17:52 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**कार्यालयांसाठी सहपत्रे :**

१) उमेदवारांच्या नावाची यादी (उमेदवारांचा भ्रमणध्वनी व ई मेल क्रमांकासह)
२) उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत
३) सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१७ साठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेल्या जाहिरातीची प्रत (अधिसूचना)
४) प्रतिवेदन नमूना (उमेदवार दिनांक २६.११.२०१८ पर्यंत आपल्या विभागात हजर न झाल्यास त्या उमेदवाराच्या आवेदनपत्राच्या संगणकीय प्रतीसह कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३०.११.२०१८ पर्यंत या विभागास पाठविण्यात यावा.)

**प्रत :-**

१) अवर सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, यांना उपरोक्त सहपत्रांसह
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांना उपरोक्त सहपत्रांसह
३) सर्व संबंधित उमेदवार, यांना रुजू अहवालाचा नमुना प्रतीसह (ई मेल द्वारे)
४) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १४-अ) (संग्रहार्थ).

# सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०१७ मधून मंत्रालयीन विभागात व महाराष्ट्र लोकसेवा आयोगात करावयाचे प्रतिक्षायादीतील उमेदवारांचे नियतवाटप

## सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्र.एएससी १४१८/प्र.क्र.९०/१४-अ, दिनांक : २४ ऑक्टोबर, २०१८ सोबतचे (विवरणपत्र "अ")

| अ.क्र. | महाराष्ट्र लोकसेवा आयोग प्रतिक्षायादी क्रमांक | उमेदवाराचे नांव | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | नियतवाटप करण्यात आलेले मंत्रालयीन विभाग/ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २ | NADE MAHESH BHARATRAO | Open | OPEN-General-Wt-२ | मृद व जलसंधारण विभाग |
| २ | ३ | CHANDGUDE RAJENDRA TRIMBAKRAO | Open | OPEN-General-Wt-३ | विधि व न्याय विभाग |
| ३ | ४ | ADHURE DIGAMBAR KASHINATH | Open | OPEN-General-Wt-४ | नगर विकास विभाग |
| ४ | ५ | Tompe Yogeshwar Nagnathrao | Open | OPEN-General-Wt-५ | सामान्य प्रशासन विभाग |
| ५ | ६ | PAWAR AMOL SHIVAJI | Open | OPEN-General-Wt-६ | महाराष्ट्र लोकसेवा आयोग |
| ६ | ७ | DHERE MANGESH MAHADEV | Open | OPEN-General-Wt-७ | गृह विभाग |
| ७ | ८ | DEULGAONKAR YOGANAND BABURAO | Open | OPEN-General-Wt-८ | गृह विभाग |
| ८ | ९ | SHINDE AJIT AWADHUT | Open | OPEN-General-Wt-९ | सामान्य प्रशासन विभाग |
| ९ | १० | SANDESH SADASHIV TADAVLEKAR | Open | OPEN-General-Wt-१० | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| १० | ११ | KOLPE KIRAN RAM | Open | OPEN-General-Wt-११ | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| ११ | १२ | KUTE PAVAN LILADHAR | NT(D) | NT-D-General-Wt-१ | ग्राम विकास विभाग |
| १२ | १३ | KSHIRSAGAR RAHUL HIMMAT | OBC | OBC-General-Wt-१ | मृद व जलसंधारण विभाग |
| १३ | १४ | SHINDE SUSHANT LAXMAN | OBC | OBC-General-Wt-२ | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग |
| १४ | १५ | HASE PRADIP PUNJAHARI | OBC | OBC-General-Wt-३ | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| १५ | १६ | BHANDALKAR RAHUL ANANDRAO | DT(A) | DT-A-General-Wt-१ | महाराष्ट्र लोकसेवा आयोग |
| १६ | १७ | ravikumar sudhakar khillare | SC | SC-General-Wt-१ | मृद व जलसंधारण विभाग |
| १७ | १८ | PAWAR AMAR SAMPAT | DT(A) | DT-A-General-Wt-२ | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग |
| १८ | १९ | KAMBLE DHANRAJ MOHANRAO | SC | SC-General-Wt-२ | सार्वजनिक बांधकाम विभाग |

| अ.क्र. | महाराष्ट्र लोकसेवा आयोग प्रतिक्षायादी क्रमांक | उमेदवाराचे नांव | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | नियतवाटप करण्यात आलेले मंत्रालयीन विभाग/ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १९ | २० | MASALGE SUCHITRA MANAOHAR | Open | OPEN-Female-Wt-१ | नगर विकास विभाग |
| २० | २१ | Baisane Dinesh Kisan | SC | SC-General-Wt-३ | कृषि व पदुम विभाग |
| २१ | २२ | NIKAM ARCHANA BAPUSO | Open | OPEN-Female-Wt-२ | महाराष्ट्र लोकसेवा आयोग |
| २२ | २३ | SHRUTI SUBHASH LOKHANDE | OBC | OBC-Female-Wt-१ | आदिवासी विकास विभाग |
| २३ | २४ | Bhosale Sarika Aravind | Open | OPEN-Female-Wt-३ | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| २४ | २५ | GORAD MILAN UTTAM | NT(C) | NT-C-Female-Wt-१ | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| २५ | २६ | LAMBAT AISHA VASANTRAO | OBC | OBC-Female-Wt-२ | मराठी भाषा विभाग |
| २६ | २७ | SUTAR AMRUTA ASHOK | OBC | OBC-Female-Wt-३ | कृषि व पदुम विभाग |
| २७ | २८ | RAJABAI TUKARAM PAWAR | Open | OPEN-Female-Wt-४ | नगर विकास विभाग |
| २८ | २९ | KAPSE KAVITA GOVINDRAO | Open | OPEN-Female-Wt-५ | वित्त विभाग |
| २९ | ३० | DESHMUKH SHITAL PRADIP | Open | OPEN-Female-Wt-६ | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |
| ३० | ३१ | Kadam Mayuri Tanaji | Open | OPEN-Female-Wt-७ | वित्त विभाग |
| ३१ | ३२ | PATIL SWAPNALI SHIVAJI | Open | OPEN-Female-Wt-८ | जलसंपदा विभाग |
| ३२ | ३३ | prajakta ashok tavhare | Open | OPEN-Female-Wt-९ | गृह विभाग |
| ३३ | ३४ | KHADE MANISHA DHANAJI | NT(D) | NT-D-Female-Wt-१ | वित्त विभाग |
| ३४ | ३५ | YOGESH DNYANDEO ERANDE | SBC | SBC-General-Wt-१ | सामान्य प्रशासन विभाग |
| ३५ | ३६ | Poman Paurnima Popat | Open | OPEN-Female-Wt-१० | सामान्य प्रशासन विभाग |
| ३६ | ३७ | VISHWASE RONAK BABASAHEB | SC | SC-Female-Wt-१ | आदिवासी विकास विभाग |
| ३७ | ३८ | MANEMOD JAMNAJI SHESHERAO | ST | ST-General-Wt-१ | गृहनिर्माण विभाग |
| ३८ | ३९ | CHAVAN ARATI RAMESH | ST | ST-Female-Wt-१ | नगर विकास विभाग |
| ३९ | ४० | Jayashri Govind Naik | Open | OPEN-Sports-Wt-१ | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| ४० | ४१ | AGLAWE SONALI ARUNRAO | SC | SC-Sports-Wt-१ | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |

# उमेदवारांसाठी रुजू अहवाल

| | | |
|---|---|---|
| उमेदवाराचे नांव | : | |
| उमेदवाराची जन्मतारीख | : | |
| उमेदवाराची शैक्षणिक अर्हता | : | |
| उमेदवाराचा प्रतिक्षायादीतील शिफारस क्रमांक | : | |
| उमेदवाराचा स्वत:चा मूळ प्रवर्ग | : | |
| म.लो.आ. ने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | : | |
| उमेदवाराचा भ्रमणध्वनी क्रमांक | : | |
| उमेदवाराचा ई-मेल आय.डी. | : | |

प्रति,

अवर सचिव (कार्यासन १४-अ),
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
५ वा मजला, खोली क्रमांक ५५७-ए (विस्तारित)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

महोदया,

मी खाली सही करणार श्री/श्रीमती ____________________

नमूद करतो/करते की, आपले ज्ञापन क्रमांक: एएससी १४१८/प्र.क्र.९०/१४-अ, दिनांक २४-१०-२०१८ नुसार

मी ____________________ विभाग/कार्यालयात दिनांक __________

रोजी रुजू झालो/झाले. सदरहू माहिती आपणास उचित कार्यवाहीसाठी कळविण्यात येत आहे.

आपला/आपली विश्वासू,

( )

उमेदवाराची सही व नांव

**टीप :**

(१) नियतवाटप केलेल्या विभाग/कार्यालयात हजर झाल्यानंतर उमेदवाराने तात्काळ वरील पत्र या विभागाकडे (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १४-अ) पाठवावे. अन्यथा त्यांना दिलेली नियुक्ती त्यांनी स्विकारली नाही असे समजून योग्य ती पुढील कार्यवाही केली जाईल याची त्यांनी नोंद घ्यावी

(२) ज्ञापनामध्ये उमेदवाराच्या नावापुढे दर्शविलेला क्रमांक हा त्याचा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडील प्रतिक्षायादीतील शिफारस क्रमांक आहे. तो क्रमांक वर दर्शविलेल्या ठिकाणी नमूद करावा.

## नियतवाटप केलेल्या आयोग पुरस्कृत उमेदवारासंबंधी प्रतिवेदन

क्रमांक :

(विभाग/कार्यालयाचे नांव व पत्ता)

दिनांक :

प्रति,

अवर सचिव (कार्यासन १४-अ),
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
५ वा मजला, खोली क्रमांक ५५७-ए (विस्तारित)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

विषय :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रतिक्षायादीतील शिफारस केलेल्या उमेदवारांची सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०१७

संदर्भ :- सामान्य प्रशासन विभागाचे क्र.एएससी १४१८/प्र.क्र.९०/१४-अ, दिनांक २४-१०-२०१८ चे ज्ञापन.

संदर्भाधिन उमेदवारांबाबतचे प्रतिवेदन पुढीलप्रमाणे आहे :-

**(अ) नियुक्ती स्विकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | शिफारस क्रमांक |
|---|---|---|
| | | |

**(ब) नियुक्ती न स्विकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | शिफारस क्रमांक |
|---|---|---|
| | | |

वरील (अ) येथे दर्शविलेल्या उमेदवारांनी योग्य ती प्रमाणपत्रे सादर केली असून ते सहायक कक्ष अधिकारी पदावरील नियुक्तीकरीता आवश्यक त्या सर्व अटी पूर्ण करीत असल्याने त्यांच्या नेमणुकीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले असून त्याच्या प्रती सोबत जोडण्यात आल्या आहेत. तसेच विहित कालावधीत नियुक्ती न स्विकारणाऱ्या (ब) येथे दर्शविलेल्या उमेदवारांचे मूळ अर्ज (उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत) सोबत परत पाठविण्यात येत आहेत.

सहपत्र :- वरीलप्रमाणे

(सही व पदनाम)

| अ.क्र. | मंत्रालयीन विभाग/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालय यांचे पत्ते |
|---|---|
| १ | अवर सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, ५ वा मजला, दालन क्र.५५३ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२८८१८९७ |
| २ | अवर सचिव (आस्थापना), गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र. २२०२५०८८, २२७९३८५८ |
| ३ | अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, ५ वा मजला, दालन क्र.५२२ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६९०, २२८१३३४७ |
| ४ | अवर सचिव (आस्थापना), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , दालन क्र.४४० (विस्तार), ४ था मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र. २२७९३१६८, २२०४६२५९ |
| ५ | अवर सचिव (आस्थापना), नगर विकास विभाग, ४ था मजला, मंत्रालय मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र. २२७९४१९७, २२७९४१९४, २२८२०४५५ |
| ६ | अवर सचिव (आस्थापना), वित्त विभाग, ३ रा मजला, दालन क्र.३१९ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३२६९, २२८२६८११ |
| ७ | अवर सचिव (आस्थापना), सार्वजनिक बांधकाम विभाग, २ रा मजला, दालन क्र.२६० ( विस्तार ), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३८४७, २२८१४९७१ |
| ८ | अवर सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग, ३ रा मजला, मंत्रालय, मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र. २२७९४१७६ |
| ९ | अवर सचिव (आस्थापना), विधी व न्याय विभाग, ५ वा मजला, मंत्रालय, मुख्य इमारत, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६१०, २२०२८५०० |
| १० | अवर सचिव (आस्थापना), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दालन क्र.१२० (विस्तार), पहिला मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३७२१, २२८१०३९४ |
| ११ | अवर सचिव (आस्थापना), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, विस्तार इमारत पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३२३७ |
| १२ | अवर सचिव (आस्थापना), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, २ रा मजला, दालन क्र.२१९ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३०५० |
| १३ | अवर सचिव (आस्थापना), गृहनिर्माण विभाग, ३ रा मजला, मंत्रालय मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र.२२७९३८६३ |
| १४ | अवर सचिव (आस्थापना), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला, क्रॉफर्ड मार्केट समोर, मुंबई ४०० ००१. दूरध्वनी क्र.२२६१६७०२, २२६१६७०१ |
| १५ | अवर सचिव (आस्थापना), सार्वजनिक आरोग्य विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, शासकीय इमारत, १० वा मजला, क्रॉफर्ड मार्केट समोर, मुंबई ४०० ००१. दूरध्वनी क्र. २२६१७५१०- विस्तार क्र.२१२ |
| १६ | अवर सचिव (आस्थापना), आदिवासी विकास विभाग, पहिला मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३०३१ |
| १७ | अवर सचिव (आस्थापना), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, ३ रा मजला, दालन क्र.३१७ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६४२ |
| १८ | अवर सचिव (आस्थापना), मराठी भाषा विभाग, मंत्रालयासमोर, ८ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दूरध्वनी क्र.२२०२५९३३/२२७९४१७० |
| १९ | अवर सचिव (आस्थापना), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, विस्तार इमारत पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३२३७ |
| २० | सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,५ १/२, ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०० ०२१. दुरध्वनी क्र.२२७९५९०० |




# महाराष्ट्र लोकसेवा आयोग
# Maharashtra Public Service Commission

मुख्य कार्यालय : ५<sup></sup>½ ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०००२१ दूरध्वनी-२२७९५९०० फॅक्स:२२८८०५२४
फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा माळा, फोर्ट, मुंबई ४००००१ दूरध्वनी :२२६७०२१०/१४८/२४८,२२१०२२२२. फॅक्स : २२६७३१९५
ई-मेल – sec.mpsc@maharashtra.gov.in वेबसाईट - www.mpsc.gov.in, https://mahampsc.mahaonline.gov.in

## सहायक कक्ष अधिकारी मुख्य परीक्षा - २०१७

**जाहिरात क्रमांक : ६८/२०१७**

**अधिसूचना क्रमांक :एनओटी-३६१७/सीआर-२२/२०१७/तीन**

जाहिरात क्रमांक २३/२०१७, दिनांक २६ एप्रिल, २०१७ नुसार आयोगामार्फत दिनांक १६ जुलै, २०१७ रोजी घेण्यात आलेल्या सहायक कक्ष अधिकारी, विक्रीकर निरीक्षक, पोलीस उप निरीक्षक संयुक्त पूर्व परीक्षा - २०१७ च्या निकालाआधारे सहायक कक्ष अधिकारी मुख्य परीक्षा - २०१७ च्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची **सहायक कक्ष अधिकारी मुख्य परीक्षा - २०१७ रविवार, दिनांक १० डिसेंबर, २०१७ रोजी फक्त मुंबई** येथे घेण्यात येईल.

२. प्रस्तुत परीक्षेमधून भरावयाच्या पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| **सहायक कक्ष अधिकारी, गट-ब (अराजपत्रित) (एकूण १०० + ७ # = १०७ पदे)** | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रवर्ग | अ.जा. | अ.ज. | वि.जा. (अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | इ.मा.व. | वि.मा.प्र. | एकूण मागासवर्गीय | खुला | एकूण पदे |
| पदसंख्या | १२ | ७ | ६+१# | २ | ३+१# | २ | १५+१# | ३ | ५०+३# | ५०+४# | १०७ |
| **रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :-** | | | | | | | | | | | |
| (१)सर्वसाधारण | ७ | ५ | ४+१# | १ | २ | १ | ९+१# | २ | ३१+२# | ३२+३# | ६८ |
| (२) महिला | ४ | २ | २ | १ | १+१# | १ | ५ | १ | १७+१# | १५+१# | ३४ |
| (३) खेळाडू | १ | -- | -- | -- | -- | -- | १ | -- | २ | ३ | ५ |
| # महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील पदे | | | | | | | | | | | |

**३. पदसंख्या व आरक्षणासंदर्भात सर्वसाधारण तरतुदी:-**

**३.१** वर नमूद पदसंख्या व आरक्षणामध्ये शासनाच्या संबंधित विभागाच्या सूचनेनुसार बदल होण्याची शक्यता आहे.

**३.२** महिला व खेळाडूंसाठीचे आरक्षण हे शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

**३.३** महिलांसाठी आरक्षित पदाकरिता दावा करणा-या उमेदवारांनी महिला आरक्षणाचा लाभ घ्यावयाचा असल्यास त्यांनी अर्जामध्ये न चुकता महाराष्ट्राचे अधिवासी (Domiciled) असल्याबाबत तसेच नॉन क्रीमीलेअर मध्ये मोडत असल्याबाबत (अ.जा. व अ.ज. वगळून) स्पष्टपणे दावा करणे आवश्यक आहे.

**३.४** वि.जा (अ), भ.ज. (ब), भ.ज. (क) व भ.ज. (ड) प्रवर्गासाठी आरक्षित असलेली पदे आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदासाठी संबंधित वर्गवारीतील योग्य व पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास अद्ययावत शासन धोरणाप्रमाणे उपलब्ध प्रवर्गातील उमेदवाराचा विचार गुणवत्तेच्या आधारावर करण्यात येईल.

**३.५** शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १ जुलै, २०१६ तसेच शासन शुध्दीपत्रक क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८ ऑगस्ट, २०१६ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणासंदर्भात तसेच वयोमर्यादेतील सवलतीसंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

**३.६** प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणाचा दावा करणा-या उमेदवाराच्या बाबतीत त्यांची क्रीडा विषयक प्रमाणपत्रे योग्य असल्याबाबत व खेळाडू प्रवर्गातील आरक्षित पदासाठी पात्र ठरतो याबाबत, आयोगास अर्ज सादर करण्यापूर्वीच, सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले प्रमाणपत्र प्राप्त केलेले असणे आवश्यक आहे.

**३.७** संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय किंवा सक्षम प्राधिका-याकडे प्रमाणपत्रे सादर करताना पात्र खेळाडू उमेदवाराने प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणासाठी त्यांना पात्र ठरविणारी आपली खेळाडू विषयक **सर्व प्रमाणपत्रे एकाच वेळी** सादर करणे आवश्यक आहे.

**३.८** क्रीडा प्रमाणपत्र योग्य असल्याबाबत व खेळाडू कोणत्या संवर्गासाठी पात्र ठरतो याविषयी अर्ज सादर करण्यापूर्वीच्या दिनांकाचे सक्षम प्राधिका-याने प्रदान केलेले प्रमाणपत्र सादर केले तरच त्यांना खेळाडू प्रवर्गाच्या आरक्षणाचा लाभ घेता येईल.

**३.९** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक कआस १३१५/प्र.क्र.१२०/१४ब, दिनांक १६ एप्रिल, २०१६ नुसार अंधत्व किंवा क्षीणदृष्टी, श्रवणशक्तीतील दोष व चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदूचा अर्धांगवायू या प्रकारच्या पात्रतेचे निकष धारण करणारे विकलांग उमेदवार गुणवत्तेनुसार शिफारशीसाठी पात्र असतील.

**३.१०** विकलांग उमेदवारांची पात्रता शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

**३.११** विकलांगांसाठी असलेली पदे भरावयाच्या एकूण पदसंख्येपैकी असतील.

**३.१२** विकलांगासाठी आरक्षित पदांवर शिफारस करताना उमेदवार कोणत्या सामाजिक प्रवर्गातील आहे, याचा विचार न करता विकलांग गुणवत्ता क्रमांकानुसार त्यांची शिफारस करण्यात येईल.

**३.१३** विकलांग व्यक्तींसाठी असलेल्या आरक्षण, वयोमर्यादा अथवा कोणत्याही सवलतींचा फायदा घेऊ इच्छिणा-या उमेदवारांनी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक अप्राके-२०१२/प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दिनांक ६ ऑक्टोबर, २०१२ मधील आदेशानुसार SADM या संगणक प्रणालीद्वारे वितरित करण्यात आलेले नवीन नमुन्यातील विकलांगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे.

**३.१४** समांतर आरक्षणाबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०१२/प्र.क्र.१६/१२/१६-अ, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**३.१५** मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्रमांक २०५३/२०१४ प्रकरणी होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून प्रस्तुत पदभरतीची कार्यवाही करण्यात येईल.

३.१६ परीक्षेच्या कोणत्याही टप्प्यावर मागासवर्गीयासाठी विहित केलेली वयोमर्यादा, शुल्क तसेच इतर पात्रता विषयक अटी/निकषांसंदर्भात कोणतीही सूट/सवलत घेतली असल्यास, अशा मागासवर्गीय उमेदवारांची अमागास (सर्वसाधारण) पदावर शिफारस करण्यात येणार नाही.

३.१७ अमागास उमेदवारांकरीता विहित केलेल्या वयोमर्यादा, शुल्क तसेच इतर पात्रता विषयक निकषांसदर्भातील अटींची पुर्तता करणा-या सर्व उमेदवारांचा अमागास सर्वसाधारण पदावरील शिफारशींकरीता विचार होत असल्याने सर्व आरक्षित प्रवर्गातील उमेदवारांनी त्यांच्या प्रवर्गासाठी पद आरक्षित/उपलब्ध नसले तरी, अर्जामध्ये त्यांच्या मूळ आरक्षित प्रवर्गासंदर्भातील सत्य माहिती अचूकपणे नमूद करणे बंधनकारक आहे.

**४. विकलांग उमेदवार :- लेखनिक व अनुग्रह कालावधीबाबत**

४.१ फक्त दृष्टीहीन, अल्पदृष्टी, अस्थिव्यंग, सेरेब्रल पाल्सी आणि डिस्लेक्सियाने बाधित व किमान ४०% कायमस्वरूपी विकलांगत्व असलेल्या पात्र उमेदवारांना, ते लिहिण्यासाठी सक्षम नसल्यास, परीक्षा प्रयोजनार्थ गुणवत्तेनुसार लेखनिकाची मदत घेता येईल व अनुग्रह कालावधी (Compensatory Time) अनुज्ञेय राहील. विकलांगत्वामुळे लिहिण्यासाठी स्वत: सक्षम नसल्याबाबत अथवा विकलांगत्वामुळे लिहिण्याच्या वेगावर मर्यादा येत असल्याबाबत संबंधित उमेदवारास आयोगाने विहित केलेल्या नमुन्यात सक्षम प्राधिका-याने प्रदान केलेले वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

४.२ प्रत्यक्ष परीक्षेच्यावेळी उत्तरे लिहिण्यासाठी सक्षम नसलेल्या, पात्र विकलांग उमेदवारांना, लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीची आवश्यकता असल्यास संबंधित उमेदवाराने ऑनलाईन पध्दतीने आयोगास अर्ज सादर केल्याच्या दिनांकापासून सात (७) दिवसाच्या आत आवश्यक प्रमाणपत्र/कागदपत्रांसह विहित नमुन्यामध्ये आयोगाकडे लेखी विनंती करणे आवश्यक आहे.

४.३ लेखनिकाची व्यवस्था उमेदवारांकडून स्वत: केली जाणार आहे की आयोगाच्या कार्यालयामार्फत लेखनिकाची व्यवस्था करावी लागणार आहे याचा स्पष्ट उल्लेख जाहिरातीस अनुसरुन ऑनलाईन पध्दतीने केलेल्या अर्जामध्ये असल्यासच विहित नमुन्याद्वारे प्राप्त लेखी विनंतीचा विचार केला जाईल.

४.४ अर्जामध्ये मागणी केली नसल्यास व आयोगाची विहित पध्दतीने पूर्व परवानगी घेतली नसल्यास ऐनवेळी लेखनिकाची मदत घेता येणार नाही अथवा अनुग्रह कालावधी अनुज्ञेय असणार नाही.

४.५ विकलांग व्यक्तींना लेखनिक पुरविण्याबाबत व अनुग्रह कालावधी अनुज्ञेय ठरविण्याबाबत मार्गदर्शक सूचना, विविध अर्जाचे नमुने, विशेष सूचना, संबंधित शासन आदेश इत्यादी बाबी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील "विकलांग व्यक्ति" या सदरामध्ये उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

४.६ फक्त आयोगाच्या कार्यालयाकडून लेखी परवानगी प्राप्त झालेल्या उमेदवारांनाच लेखनिकाची मदत घेता येईल अथवा अनुग्रह कालावधी देय असल्यास अनुज्ञेय राहील.

**५. वेतनश्रेणी :-**

रूपये ९,३००-३४,८०० + ग्रेड पे- ४,३०० अधिक नियमांनुसार भत्ते.

**६. पात्रता :-**

६.१ भारतीय नागरिक

**६.२ वयोमर्यादा :-**

| वयोमर्यादा गणण्याचा दिनांक | वय | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | किमान | कमाल | | | | | | |
| | अमागास / मागासवर्गीय | अमागास | मागासवर्गीय | प्राविण्य प्राप्त खेळाडू | | माजी सैनिक, आणिबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकारी | | विकलांग उमेदवार |
| | | | | अमागास | मागासवर्गीय | अमागास | मागासवर्गीय | |
| १ ऑगस्ट ,२०१७ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४८ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत |

६.३ विहित वयोमर्यादा इतर कोणत्याही बाबतीत शिथिल केली जाणार नाही.

**६.४ अर्हता :-**

६.४.१ सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा तिच्याशी समतुल्य म्हणून शासनाने घोषित केलेली इतर कोणतीही तत्सम अर्हता.

६.४.२ सहायक कक्ष अधिकारी मुख्य परीक्षा - २०१७ च्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या सर्व उमेदवारांनी सहायक कक्ष अधिकारी मुख्य परीक्षा - २०१७ करीता अर्ज स्वीकारण्यासाठी विहित केलेल्या अंतिम दिनांकापर्यंत संबंधित शैक्षणिक अर्हता धारण करणे अनिवार्य आहे.

६.४.३ अंतर्वासिता (Internship) किंवा कार्यशाळेतील कामाचा अनुभव आवश्यक असेल अशा पदवी धारण करणा-या उमेदवारांनी सदर अट मुख्य परीक्षेचा अर्ज स्वीकारण्याच्या अंतिम दिनांकापर्यंत पूर्ण केली असेल तरच त्याला पदवीधर समजण्यात येईल.

६.४.४ उमेदवाराला मराठी लिहिणे, वाचणे, बोलता येणे अत्यावश्यक आहे.

**७. परीक्षेचे टप्पे - एक**

७.१ मुख्य परीक्षा - २०० गुण

७.२ मुख्य परीक्षेतील एकूण गुणांच्या आधारे गुणवत्तेनुसार अंतिम निवड करण्यात येईल.

**७.३ मुख्य परीक्षेस प्रवेश :-**

७.३.१ सहायक कक्ष अधिकारी, विक्रीकर निरीक्षक, पोलीस उप निरीक्षक संयुक्त पूर्व परीक्षा - २०१७ च्या निकालाआधारे, सहायक कक्ष अधिकारी मुख्य परीक्षा-२०१७ च्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या आणि पूर्व परीक्षेच्या जाहिरातीत नमूद केलेल्या शैक्षणिक अर्हता व अन्य अटींची **दिनांक २७ ऑक्टोबर, २०१७ रोजी किंवा त्यापूर्वी** पूर्तता करणा-या उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येईल.

७.३.२ मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र उमेदवाराने आयोगाकडून निश्चित करण्यात आलेल्या कालावधीत आयोगाच्या http://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाद्वारे फक्त ऑनलाइन पध्दतीने अर्ज/माहिती सादर करणे तसेच विहित शुल्क भरणे आवश्यक आहे.

७.३.३ पूर्व परीक्षेकरीता आयोगास अर्जाद्वारे सादर केलेल्या माहितीच्या आधारेच मुख्य परीक्षेकरीता आवश्यक माहिती ऑनलाईन पध्दतीने सादर करणे आवश्यक राहील.

**८. प्रमाणपत्र पडताळणी:-**

८.१ आयोगाने निश्चित केलेल्या किमान सीमारेषेनुसार शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/ शासन परिपत्रकातील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे नियुक्तीपूर्वी सक्षम प्राधिका-याकडून तपासली जाईल.

८.२ अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्रे सादर करणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी केली जाईल.

७००७५

८.३ अर्जातील दाव्यानुसार सक्षम प्राधिका-याकडून करण्यात आलेल्या प्रमाणपत्र पडताळणीच्या आधारे पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच नियुक्ती देण्याची कार्यवाही सक्षम प्राधिका-यांकडून करण्यात येईल.

**९. सेवाप्रवेशोत्तर शर्ती :-**

९.१ नियुक्त झालेल्या व्यक्तीस खालील परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील :-

९.१.१ जेथे प्रचलित नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा विहित केली असेल अथवा आवश्यक असेल तेथे त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा

९.१.२ हिंदी आणि मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर ती व्यक्ती अगोदरच परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा

९.१.३ महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळणीबाबतची परीक्षा जर ती व्यक्ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल तर ती परीक्षा

**१०. शुल्क (रुपये):** १०.१ :- अमागास - **५२४/-** १०.२ :- मागासवर्गीय - **३२४/-**

**११. अर्ज करण्याची पध्दत :-**

११.१ प्रस्तुत परीक्षेसाठी फक्त ऑनलाईन पद्धतीने अर्ज/माहिती स्वीकारण्यात येईल.

११.२ पात्र उमेदवाराला वेब-आधारित (Web-based) ऑनलाईन अर्ज https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाद्वारे **दिनांक २७ ऑक्टोबर, २०१७** पर्यंत सादर करणे आवश्यक राहील.

११.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज/माहिती सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mahampsc.mahaonline.gov.in तसेच www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

११.४ आयोगास अर्ज/माहिती सादर करताना माध्यमिक शालांत प्रमाणपत्रावर असलेल्या नावाप्रमाणेच नावाची नोंदणी करणे व आयोगास अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा, आयोगाच्या सूचनांचे उल्लंघन समजून कारवाई करण्यात येईल.

११.५ आयोगास चुकीची माहिती सादर करणा-या उमेदवारास सदर परीक्षेसाठी व यापुढील सर्व निवडीकरिता अपात्र ठरविण्यात येईल.

११.६ आयोगास अर्ज/माहिती सादर केल्यानंतर विहित मुदतीत परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतले जाणार नाही.

११.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

११.७.१ शुल्क भरण्याकरीता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील " माझे खाते " या लिंक वर क्लिक करावे.

११.७.२ "माझे खाते " या लिंक वर क्लिक केल्यानंतर "माझे ॲप्लीकेशन" सदरातील 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंकवर क्लिक करावे.

११.७.३ 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंक वर क्लिक केल्यानंतर अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या/न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. **'Unpaid'** लिहिलेल्या पद/परीक्षेसमोर **'Pay Now'** अशी लिंक उपलब्ध असेल.

११.७.४ **" Pay Now"** या लिंक वर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील:- **(अ)** ऑनलाईन पेमेंट **(ब)** नागरी सुविधा केंद्र **(क)** चलनाव्दारे

११.७.५ क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन परीक्षा शुल्क अदा करता येईल.

११.७.६ नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. सदर कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

११.७.७ चलनाव्दारे परीक्षा शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

११.७.८ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर केल्यास त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

११.७.९ विहित पध्दतीने अर्ज सादर करुन शुल्क भरण्याची कार्यवाही, तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही **दिनांक २७ ऑक्टोबर, २०१७ रोजी २३.५९ वाजेपर्यंत** पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

११.७.१० चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये **दिनांक ३० ऑक्टोबर, २०१७** पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.

११.७.११ ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा झाला आहे किंवा कसे याची स्थिती (status) अवगत होईल. त्याची उमेदवाराने अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वीच तपासणी करुन खात्री करणे अथवा परीक्षा शुल्काचा भरणा झाल्याबाबतची स्थिती उपलब्ध नसल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे. विहित दिनांकानंतर यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या तक्रारींची दखल घेतली जाणार नाही.

**१२. प्रवेशप्रमाणपत्र :-**

१२.१ प्रस्तुत परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे ७ दिवस अगोदर प्रवेश प्रमाणपत्र उमेदवाराच्या प्रोफाईलदवारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

१२.२ परीक्षेच्या वेळी उमेदवाराने स्वतःचे प्रवेश प्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१३.परीक्षेस प्रवेश :-**

१३.१ परीक्षेस येतेवेळी स्वतःच्या ओळखीच्या पुराव्यासाठी स्वतःचे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान कोणतेही एक मूळ ओळखपत्र व त्याची छायांकित प्रत सोबत आणणे अनिवार्य आहे.

१३.२ फक्त पेन, पेन्सिल, प्रवेशप्रमाणपत्र, ओळखीचा मूळ पुरावा व त्याची छायांकित प्रत अथवा प्रवेशप्रमाणपत्रावरील सूचनेनुसार आयोगाने परवानगी दिलेल्या साहित्यासह उमेदवाराला परीक्षा कक्षात प्रवेश देण्यात येईल.

१३.३ डिजीटल डायरी, पेजर, मायक्रोफोन, मोबाईल फोन, कॅमेरा अंतर्भूत असलेली कोणत्याही प्रकारची साधने, सिमकार्ड, ब्लू टूथ, दूरसंचार साधने म्हणून वापरण्या योग्य कोणतीही वस्तू, इलेक्ट्रॉनिक उपकरणे, वहया, नोटस, परवानगी नसलेली पुस्तके, बॅग, परिगणक (calculator) इत्यादी किंवा कोणतीही संपर्क साधने/साहित्य परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच परीक्षा कक्षात आणण्यास, स्वतःजवळ बाळगण्यास, त्याचा वापर करण्यास अथवा त्याच्या वापरासाठी इतरांची मदत घेण्यास सक्त मनाई आहे. असे साहित्य आणल्यास ते परीक्षा केंद्राबाहेर ठेवण्याची व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील.

१३.४ आयोगाने परवानगी नाकारलेले कोणत्याही प्रकारचे अनधिकृत साधन/साहित्य परीक्षेच्यावेळी संबंधित उपकेंद्राच्या मुख्य प्रवेशद्वारावरच ठेवावे लागेल. अशा साधन/साहित्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या नुकसानीस आयोग, जिल्हा प्रशासन किंवा शाळा/महाविद्यालय व्यवस्थापन जबाबदार राहणार नाही.

**१४.** प्रस्तुत जाहिरातीमध्ये परीक्षेसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज स्वीकारण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क, निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया, परीक्षा योजना, अभ्यासक्रम इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील स्पर्धा परीक्षेअंतर्गत **'उमेदवारांना सर्वसाधारण सूचना'** तसेच **"परीक्षा योजना"** विभागातील **'सहायक कक्ष अधिकारी, विक्रीकर निरीक्षक, पोलीस उपनिरीक्षक परीक्षा'** मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व अधिसूचना अधिकृत समजण्यात येईल.

**१५.** प्रस्तुत परीक्षेचा सविस्तर अभ्यासक्रम आयोगाच्या **www.mpsc.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

**१६.** सदर अधिसूचना आयोगाच्या www.mpsc.gov.in तसेच https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

ठिकाण : मुंबई
दिनांक : १३ ऑक्टोबर, २०१७

सुनिल अवताडे
उप सचिव
महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

(१) आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात, तसेच, शारीरिक चाचणी व मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन, अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक साधने आणण्यास व वापरण्यास सक्त मनाई आहे. (२) प्रमाणपत्र पडताळणीच्या वेळी पात्रतेसंदर्भातील सर्व मूळ प्रमाणपत्रे सादर न केल्यास शिफारस/नियुक्तीसाठी विचार करण्यात येणार नाही.